सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन या संगणक प्रणाली करिता State Scheme Manager घोषित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१३४/साशि-१

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २७ जुलै, २०१७

**वाचा :-** (१) वित्त विभागाचे अ.शा. पत्र क्र. संकीर्ण २०१४/प्र.क्र.२९/कोषा-५ दिनांक १७-१०- २०१६ चे पत्र

(२) वित्त विभागाचे क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र. ११/कोषा प्रशा-४ दिनांक ९-६-२०१७ चे पत्र

(३) सह संचालक (सुधारणा) संचालनालय लेखा व कोषागारे, मुंबई यांचे क्र संलको-पीएफएमएस नस्ती क्र.२/५८ दिनांक १२-०७-२०१७ चे पत्र

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनामार्फत केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी राज्याच्या एकत्रित निधीमधे जमा होतो. सदरचा निधी राज्य शासनाच्या संबंधित योजना राबविणाऱ्या विभागाने राज्याच्या हिश्श्यासह अर्थसंकल्पीत केल्यानंतर, BEAMS प्रणालीद्वारे संबंधित योजना राबविणाऱ्या विभागांच्या नियंत्रक अधिकाऱ्यांना वित्त विभागामार्फत प्राप्त होतो. संबंधित नियंत्रक अधिकारी योजना उद्दिष्टाप्रमाणे आहरण व संवितराण अधिकाऱ्यांना BEAMS द्वारे योजनेचा निधी वितरीत करतात.आहरण व संवितरण अधिकारी संबंधित निधीचे कोषगारातून देयक आहरीत करुन त्याच्या बॅक खात्यात रक्कम जमा करुन योजना उद्दिष्टाप्रमाणे धनादेशाद्वारे किंवा RTGS/NEFT द्वारे संबंधित पुरवठादार/लाभार्थी यांना निधी वितरीत करतात. PFMS प्रणालीमधे संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याचे बँक खाते नोंदविण्याची प्रक्रिया केल्यावर अत्यंत सोप्या व सुटसुटीत पध्दतीने संबधित मक्तेदारास/लाभार्थी यांना प्रदान करणे शक्य होते. त्याचा हिशोब सुध्दा प्रणालीवर सदर याजनांचे प्रशासकीय नियंत्रण ठेवणाऱ्या सर्व संबंधित प्राधिकाऱ्यांना तात्काळ दिसून येतो.यासाठी राज्यामध्ये PFMS प्रणाली राबविणे अनिवार्य आहे. या शासनाच्या धोरणानुसार उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या केद्र पुरस्कृत योजना व क्रेंद्र सहाय्यीत योजनाकरिता सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) या पध्दतीचा अवलंब करण्याचे निश्चित करण्यात आले आहे. सदर प्रणालीच्या अमंलबजावणीकरिता नोडल अधिकारी, State Scheme Manager (SSM) व First Level Agency घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणालीच्या (PFMS) अमंलबजावणीकरिता एक नोडल अधिकारी, प्रत्येक केंद पुरस्कृत व केंद्र सहाय्यीत योजनांकरिता State Scheme Manager (SSM) व First Level Agency घोषित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या अनुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यीत योजनांकरिता श्री. पा.म. ताकटे उपसचिव अर्थसंकल्प यांना

विभागाने नोडल अधिकारी तसेच State Scheme Manager (SSM) User व First Level Agency घोषित करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | योजनेचे नाव व सांकेतांक क्रमांक | State Scheme Manager (SSM) | First Level Agency |
|---|---|---|---|
| १. | राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानांतर्गत अशासकीय संस्थांना सहायक अनुदान (२२०२ आय२६३) | उप सचिव, विद्यापिठ शिक्षण | राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा) |

नोडल अधिकारी:- नोडल अधिकारी हे उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजना व केंद्र सहाय्यीत योजनांकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थपन प्रणालीच्या समन्वयाचे काम करतील.

State Scheme Manager (SSM):- State Scheme Manager (SSM) यांनी प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यासाठी राज्य स्तरावर First Level Agency निर्माण करुन त्यांचा प्रशासक म्हणून त्यांच्या अधिनस्त असलेल्या अधिकारी यांची नेमणूक करावयाची आहे.

First Level Agency:- राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान(रुसा) हे First Level Agency चे प्रशासक राहतील. निधी वितरणाच्या कार्यप्रणालीनुसार त्यांचे अधिनस्त कार्यालयीन संस्था यांना PFMS प्रणालीद्वारे Second Level Agency म्हणून नोंदवून निधी वितरीत करतील.

Second Level Agency:- संबंधित संस्थेचे प्रशासकीय प्रमुख Second Level Agency चे प्रशासक राहतील. Second Level Agency च्या प्रशासकांनी PFMS प्रणालीमार्फतच पुरवठादार / लाभार्थी इत्यादींना थेट संबंधितांच्या बँक खात्यात राकमा प्रदान करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२८१५३५३९४३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

P. M Takate

Digitally signed by P. M Takate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cbc81d3569a4d80b2e2d776cce4c4a214d2dfe787783854814b3a4fa7c83b18b, cn=P. M Takate
Date: 2017.07.28 17:04:37 +05'30'

**(पा. म. ताकटे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

३. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. विशेष कार्य अधिकारी, राष्ट्रीय सेवा योजना, मुंबई
५. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, जागतिक व्यापार केंद्र,१८ वा मजला,कफ परेड, कुलाबा, मुंबई
६. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई
७. सह संचालक (सुधारणा)(PFMS), संचालनालय लेखा व कोषागारे,नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई
८. सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (कोषा-४), मंत्रालय, मुंबई
१०.श्री. सुनिल मोने, तज्ञ वरिष्ठ वित्तिय सल्लागार, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११.श्री. पद्मसिंग पाटील, सहाय्यक राज्य नोडल अधिकारी, पीएफएमएस
१२.निवड नस्ती (साशि-१)